(१४ पैकी शासन निर्णय क्र.९)
फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.
प्रत्येक न्यायालयात पैरवी अधिकारी नियुक्त करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ मे, २०१५

प्रस्तावना :-

पोलीस ठाण्यामध्ये गुन्हा दाखल झाल्यानंतर तपासाअंती न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात येते व त्या अनुषंगाने दोषारोपसिध्दीकरिता खटला सुरु राहतो. खटल्याच्या प्रत्येक सुनावणीकरिता संबधित साक्षीदार, पंच व पोलीस अधिकारी यांना न्यायालयामध्ये उपस्थित रहावे लागते. सुनावणीपुर्वी शासकिय अभियोक्त्यासोबत संबधित पोलीस अधिकारी, साक्षीदार व पंच यांची पुर्व चर्चा झाल्यास खटल्यामध्ये प्रभावीपणे बाजू मांडून दोषारोपसिध्दी होणे शक्य आहे. तथापि सदरची पुर्व चर्चा घडून येत नसल्याने दोषारोपसिध्दीचे प्रमाण घटत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सबब प्रत्येक खटल्याच्या सुनावणीपूर्वी अशी पुर्व चर्चा घडवून आणण्याकरिता समन्वय अधिका-याची आवश्यकता विचारात घेऊन प्रत्येक न्यायालयात एका पैरवी अधिका-याची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

फौजदारी खटल्यातील दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीकोनातून प्रत्येक न्यायालयात एक पैरवी अधिकारी नियुक्ती करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा पैरवी अधिकारी पोलीस हवालदार किंवा सहाय्यक पोलीस उप निरीक्षक या दर्जाचा राहिल.

३. सदचा पैरवी अधिकारी न्यायालयात सुरु असलेल्या खटल्याचा दैनंदिन आढावा घेऊन खटलानिहाय शासकिय अभियोक्त्यासोबत संबधित पोलीस अधिकारी, साक्षीदार व पंच यांची पुर्व चर्चा घडवून आणण्याची जबाबदारी पार पाडेल.

४. प्रत्येक न्यायालयाकरीता एक पैरवी अधिकारी याप्रमाणे १२९१ इतक्या पैरवी अधिकारी पदांची निर्मिती करण्याचा प्रस्ताव संचालक, अभियोग संचालनालय यांनी तयार करुन मान्यतेस्तव गृह विभागास सादर करावा.

५. न्यायालयनिहाय खटल्यांचे प्रमाण विचारात घेऊन संबधित न्यायालयात पोलीस हवालदार अथवा सहाय्यक पोलीस उप निरीक्षक यांची आवश्यकता आहे हे प्रथम निश्चित करावे. तदनंतर सदर १२९१ पदांपैकी पोलीस हवालदार व सहाय्यक पोलीस उप निरीक्षक यांची संख्या संचालक, अभियोग संचालनालय यांनी निश्चित करावी.

६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या मुळ आस्थापनेवरील पोलीस हवालदार किंवा सहाय्यक पोलीस उप निरीक्षक हे संचालक, अभियोग संचालनालय यांच्या आस्थापनेवरील पैरवी अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने राहतील.

७. संचालक, अभियोग संचालनालय यांनी निश्चित केलेल्या संख्येनुसार व मागणीनुसार पोलीस हवालदार व सहाय्यक पोलीस उप निरीक्षक यांच्या सेवा पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन द्याव्यात.

८. सदरची पोलीस हवालदार अथवा सहाय्यक पोलीस उप निरीक्षक यांची पदे पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या मुळ आस्थापनेवरील असल्याने, प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन द्यावयाच्या १२९१ पदांची भरती आराखडयात समावेश करण्याची कार्यवाही पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी करावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१५५३०५२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 12:40:30 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१२. सर्व अपर पोलीस महासंचालक
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१७. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१८. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१९. उप सचिव (पोल-१०)
२०. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती